विभागीय आयुक्तालय, औरंगाबादच्या विभाजनाबाबत नियुक्त करण्यात आलेल्या अभ्यासगटास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्रशासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एस-३०/२०१३/प्र.क्र. ३९/म-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
तारीख: १९ मे, २०१५

**वाचा:-**

१) महाराष्ट्र शासन राजपत्र, महसूल व वन विभाग, प्रारूप अधिसूचना क्र . एस-३०/२०१३/प्र.क्र. ३९/म-१०, दि. ०२.०१.२०१५ व दि. १६.०२.२०१५.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एस-३०/२०१३/प्र.क्र.३९/म-१०, दि.१६.०२.२०१५.

**प्रस्तावना:-**

विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबादचे विभाजन करुन नव्याने निर्माण करावयाच्या विभागीय आयुक्तालयात कोणत्या जिल्ह्यांचा समावेश करावा व नवीन विभागीय आयुक्तालयाचे मुख्यालय कोणत्या ठिकाणी असावे, या विषयी सखोल अभ्यास करुन तत्संबंधी शासनास शिफारशी करण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली एक-सदस्यीय अभ्यासगट एक अभ्यासगट स्थापन करण्यात आला आहे.

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखालील या अभ्यासगटास आपला अहवाल सादर करण्याकरिता २ महिन्यांचा कालावधी देण्यात आला होता. तथापि, प्रस्तुत विषयाचे व्यापक स्वरुप तसेच सदर अभ्यासगटाच्या अहवालासाठी विविध मुद्यांवर संबंधितांकडून मागविण्यात आलेली माहिती अद्याप प्राप्त झाली नसल्याने आणि मागील महिन्यांमध्ये औरंगाबाद विभागात झालेली गारपीट, अवकाळी पाऊस आणि टंचाई निवारणार्थ औरंगाबाद विभागात राबविण्यात येणाऱ्या विविध उपाययोजना या तातडीच्या कामांमुळे अहवाल तयार करण्यास आणखी काही कालावधी लागणार असल्यामुळे विहीत मुदतीत अहवाल सादर करणे शक्य न झाल्याने विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी त्यांच्या दि. ४/४/२०१५ च्या पत्रान्वये सदर अभ्यासगटास आपला अहवाल शासनास सादर करण्याकरिता मुदतवाढ देण्याची विनंती कंली असून सदर विनंती शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांची विनंती लक्षात घेता, विभागीय आयुक्तालय, औरंगाबादच्या विभाजनाबाबत विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या अभ्यासगटास आपला अहवाल शासनास सादर करण्याकरिता दि. १६.०४.२०१५ पासून पुढील ३ महिन्यापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२०११४४५२७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Pandurang Wadte

Digitally signed by Kiran Pandurang Wadte
DN: CN = Kiran Pandurang Wadte, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.20 14:26:01 +05'30'

**( कि. पां.वडते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
३) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्विय सहायक.
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व परिक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई.
७) जिल्हाधिकारी, औरंगाबाद/जालना/बीड/उस्मानाबाद/नांदेड/लातूर/परभणी/हिंगोली.
८) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) निवडनस्ती (म-१०कार्यासन)